**महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी (सुधारणा) अध्यादेश, २०१६ नुसार निवडून आलेल्या अध्यक्षांना उपाध्यक्ष निवडीबाबत आणि इतर सर्वसाधारण मुद्यांबाबतचा खुलासा.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक:-संकिर्ण-२०१६/प्र.क्र. ४६६/नवि-२०**
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२
**दिनांक:- २१ डिसेंबर, २०१६.**

वाचा:- १. सन २०१६ चा महाराष्ट्र अध्यादेश क्रमांक १६, दिनांक ३०.०८.२०१६.
२. सन २०१६ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ३८.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र अध्यादेश क्र. १६/२०१६ दि. ३०.०८.२०१६ अन्वये नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी, अधिनियम १९६५ मध्ये कलम "51A-1A" अंतर्भूत करून नगरपरिषदेच्या अध्यक्षांची सार्वत्रिक निवडणूकीव्दारे जनतेतून थेट पध्दतीने निवड करण्याबाबत तरतूद करण्यात आली आहे. त्यानुसार राज्य निवडणूक आयोगाने नगरपरिषदा/नगरपंचायती यांच्या सार्वत्रिक निवडणूकांकरिता घोषित केलेल्या एकूण ४ टप्यांपैकी प्रथम टप्यात एकूण १४७ नगरपरिषदा व १८ नगरपंचायतीच्या सार्वत्रिक निवडणूका झालेल्या आहेत, त्यानुसार १४७ नगरपरिषदांमध्ये थेट पध्दतीने नगराध्यक्ष निवडून आलेले आहेत.

२. तसेच, सन २०१६ महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ३८ अन्वये जनतेतुन थेट निवडून देण्यात आलेल्या नगराध्यक्षांना नगरपरिषदेच्या पहिल्या बैठकीचे अध्यक्ष स्थान भुषविण्याबाबत व परिषद सदस्यांचे नामनिर्देशनाबाबत तरतूद करण्यात आली आहे. याशिवाय, उपाध्यक्षाच्या निवडणूकीत समसमान मते पडल्यास थेट निवडून आलेल्या नगराध्यक्षांना निर्णायक मताचीही तरतूद करण्यात आली आहे.

३. उपरोक्त परिच्छेदात नमूद करण्यात आल्यानुसार थेट पध्दतीने निवडून आलेल्या नगराध्यक्षांना, उप-नगराध्यक्ष पदाच्या निवडणूकीमध्ये भाग घेण्याचा अथवा मतदान करण्याचा अधिकार आहे किंवा कसे तसेच उपाध्यक्ष निवडणूक आणि नामनिर्देशित सदस्यांच्या निवड प्रक्रियेत थेट निवडून आलेल्या नगराध्यक्षांची काय भूमिका राहिल ? याबाबत शासनाकडे सातत्याने विचारणा होत आहे. त्यानुषंगाने सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**परिपत्रक :-**

महाराष्ट्र अध्यादेश क्र. १६/२०१६ दि. ३०.०८.२०१६ व्दारे अधिनियमात करण्यात आलेल्या तरतूदींपुढीलप्रमाणे आहेत:-

कलम 2 (7) "Councilor" means a person duly elected as member of the Council, the directly elected president" and includes the nominated Councilor.

त्याचप्रमाणे कलम 2(49) व 51 A (1) मध्ये पुढीलप्रमाणे तरतूद आहे:-

कलम 2(49) "total number of Councilors" in relation to a Council, means the total number of the elected Councilors of that council;

51 A (1) Every council shall have a Vice-President, who shall be elected by the elected councilors from amongst themselves.

२. उपरोक्त कलम 51 A (1) मधील उपरानगराध्यक्ष निवडीच्या तरतूदीनुसार उपनगराध्यक्षाची निवड ही निवडून आलेल्या नगरपरिषदेच्या सदस्यांमधून करावयाची आहे. कलम २ (७) मध्ये नगरसेवकाच्या व्याखेमध्ये परिषद सदस्य याचा अर्थ निवडून आलेले सदस्य व थेट पध्दतीने निवडून आलेले नगराध्यक्ष असा आहे. त्याचप्रमाणे "कलम 2(49) मध्ये नमूद करण्यात आलेल्या व्याखेनुसार परिषद सदस्यांची एकूण संख्या याचा अर्थ

त्या परिषदेच्या निवडून आलेल्या परिषद सदस्यांची संख्या अशी आहे. एकंदरीत परिषद सदस्य व परिषद सदस्यांची एकूण संख्या ही निवडून आलेल्या सदस्यांशी संबंधीत आहे. त्याचप्रमाणे परिषद सदस्याच्या व्याखेमध्ये थेट पध्दतीने निवडून आलेल्या नगराध्यक्षांचा समावेश आहे."

३. थेट पध्दतीने निवडून आलेल्या नगराध्यक्षांच्या अधिकाराबाबत उपस्थित करण्यात येणाऱ्या अनुषांगिक मुद्यांबाबत खालीलप्रमाणे खुलासा करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | मुद्दा | स्पष्टीकरण |
|---|---|---|
| १ | सार्वत्रिक निवडणूकीद्वारे निवडून आलेल्या सदस्यांची पहिली बैठक कधी होईल आणि सदर बैठक कोण बोलावेल? | नगरपरिषदेची आणि अध्यक्षाची सार्वत्रिक निवडणूक झाल्यानंतर, अध्यक्ष व निर्वाचित परिषद सदस्यांची नावे राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून २५ दिवसांच्या आत कलम 51A-1A(9) नुसार नगरपरिषदेची पहिली सर्वसाधारण सभा नगराध्यक्ष बोलावेल. |
| २ | उपनगराध्यक्ष यांचे निवडणूकीची पध्दत काय असेल ? | कलम 51A-1A नुसार उपनगराध्यक्षांची निवड ही निवडून आलेल्या परिषद सदस्यांमधून महाराष्ट्र नगरपरिषद (उपाध्यक्ष पदासाठी निवडणूक घेणे) नियम, २००५ नुसार करावयाची आहे. या निवडणूकीसाठी नगराध्यक्ष हे पिठासीन अधिकारी असतील. |
| ३ | सार्वत्रिक निवडणूकीद्वारे निवडून आलेला नगराध्यक्ष हा उपनगराध्यक्षांच्या निवडणूकीत मतदान करू शकतो काय? | थेट निवडून आलेला नगराध्यक्ष हा कलम 2(7) मध्ये नमूद केल्यानुसार नगरसेवक असल्याने, तो उपनगराध्यक्षांच्या निवडणूकीत मतदान करू शकतो. |
| ४ | उपनगराध्यक्षांच्या निवडणूकीत समसमान मते पडल्यास निवड कशी होईल ? | उपनगराध्यक्षांच्या निवडणूकीत समसमान मते पडल्यास, नगराध्यक्षास, त्यास असलेल्या निर्णायक (Casting Vote) मताचा वापर करता येईल. |
| ५ | तौलनिक संख्याबळ निश्चित करताना थेट निवडून आलेल्या नगराध्यक्षांना विचारात घेता येईल का? | कलम २ (७) व २ (४९) थेट निवडून आलेला नगराध्यक्ष हा परिषद सदस्य म्हणुन गणला जात असल्यामुळे तौलनिक संख्याबळ निश्चित करताना त्यास विचारात घेऊन संख्याबळ निश्चित करावे. |
| ६ | नामनिर्देशित सदस्यांच्या नामनिर्देशनाची पध्दत कशी असेल ? | अ. महाराष्ट्र नगरपरिषदा आणि नगरपंचायती (नामनिर्देशित सदस्यांची अर्हता व नियुक्त्या करण्याची पध्दत) नियम, २०१० चे नियम ३ अन्वये निर्वाचित परिषद सदस्यांच्या एकुण संख्येच्या १० टक्के किंवा ५ यापैकी कमी असतील इतके सदस्य नामनिर्देशित होऊ शकतात.<br>आ. सदस्यांचे नामनिर्देशन करतांना नियम ५ नुसार, मान्यताप्राप्त पक्षांचे किंवा नोंदणीकृत पक्षाचे किंवा गटांच्या तौलनीक संख्याबळाच्या प्रमाणात संबंधित पक्ष/गट/आघाडी सदस्यांचे नामनिर्देशन करेल.<br>इ. संबंधित पक्ष/गट/आघाडीचे प्रमुख, प्रस्तावित सदस्यांचे नामनिर्देशन पत्र, जिल्हा प्रशासन अधिकाऱ्यांमार्फत |

| | | |
|---|---|---|
| | | जिल्हाधिकारी यांचेकडे प्रथम बैठकीच्या किमान २४ तास अगोदर सादर करतील.<br>ई. नामनिर्देशित सदस्यांच्या नियुक्तींसाठी प्राप्त शिफारस पत्र व अर्हतेची पुरावे यांची छाननी जिल्हाधिकारी स्वत: अथवा यासाठी त्यांनी पदनिर्देशित केलेला उपजिल्हाधिकारी दर्जापेक्षा कमी नसणारा अधिकारी करेल.<br>उ. पदनिर्देशित अधिकारी प्राप्त नामनिर्देशन शिफारस पत्र व अर्हतेची पुरावे यांची छाननी करुन अर्हता प्राप्त उमेदवारांची यादी संबंधित पक्ष/गट/आघाडी प्रमुखाकडे पाठवून त्याची प्रत थेट निवडून आलेल्या नगराध्यक्षांकडे पुढील कार्यवाहीकरीता बैठकीपुर्वी पाठवेल. पदनिर्देशित अधिकाऱ्याने वैधतेबाबत घेतलेला निर्णय अंतिम असेल व छाननीअंती अर्ह ठरलेल्याच व्यक्तींची नामनिर्देशित सदस्य म्हणुन नियुक्ती करण्याची नगराध्यक्षावंर बंधनकारक असेल.<br>ऊ. संबंधित पक्ष/गट/आघाडी यांना प्रस्तावित करावयाच्या सदस्य संख्येपेक्षा जास्त उमेदवार अर्ह ठरल्यास, त्यापैकी कोणत्या व्यक्तींची नावे अंतीम करावयाची ? याबाबत संबंधित पक्ष/गट/आघाडी यांचे प्रमुख लेखी स्वरुपात सभेमध्ये पिठासीन अधिकारी (नगराध्यक्ष) यांच्याकडे सादर करतील.<br>ऋ. संबंधित पक्ष/गट/आघाडीचे गटनेते यांनी नियमानुसार अनुज्ञेय संख्येपेक्षा जास्त व्यक्तींचे शिफारस पत्र नगराध्यक्षांकडे दिल्यास, अनुज्ञेय संख्येएवढीच अनुक्रमीक शिफारस पत्रे नगराध्यक्ष स्विकारेल किंवा एकाच पृष्ठावर अनुज्ञेय संख्येपेक्षा जास्त नावे नगराध्यक्षांकडे दिल्यास, अशा पत्रावरील अनुज्ञेय संख्या असलेली अनुक्रमीक नावेच नगराध्यक्ष नामनिर्देशित सदस्य पदासाठी जाहिर करेल. |
| ७ | नामनिर्देशित सदस्यांची नावे राजपत्रात प्रसिध्दीची पध्दत कशी असणार आहे ? | महाराष्ट्र नगरपरिषदा आणि नगरपंचायती (नामनिर्देशित सदस्यांची अर्हता व नियुक्त्या करण्याची पध्दत) नियम, २०१० चे नियम ६ अन्वये नामनिर्देशित झालेल्या सदस्यांची नावे राजपत्रात प्रसिध्द करण्यासाठी नगराध्यक्ष जिल्हाधिकारी यांचेकडे तात्काळ सादर करतील. |
| ८ | उपाध्यक्ष निवड, नामनिर्देशित सदस्यांचे नामनिर्देशनाबाबत नगराध्यक्षाने कायदेशीर तरतूदीचे पालन न केल्यास काय कायदेशीर कारवाई करता येईल ? | उपाध्यक्ष आणि नामनिर्देशित सदस्यांच्या निवडीबाबत महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ चे अनुक्रमे कलम ५१ (अ) (५) व २१ अन्वये दाद मागता येईल. |

४. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०१६१२२११७५५२९७८२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2016.12.21 18:00:03 +05'30'

**(ज. ना. पाटील)**
**सहसचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
२) सर्व सन्माननीय विधानसभा/ विधानपरिषद व संसद सदस्य
३) मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव
४) मा.मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव
५) सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
७) मा. लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय
८) मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी
९) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
१०) सर्व विभागीय आयुक्त
११) सर्व जिल्हाधिकारी
१२) सर्व नगराध्यक्ष (नगरपरिषदा)
१३) सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा
१४) नगर विकास विभागातील सर्व कार्यासने
१५) निवड नस्ती